**कोषागारात रोख देय अनुदान**

**अंतिम सुधारीत अनुदान २००९-२०१०**

विशेष घटक योजना
२२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता या प्रधान लेखाशिर्षाखाली साधी विहिर कार्यक्रमासाठी अनुदाने
**लेखाशिर्ष (२२१५ १३१५)**

# महाराष्ट्र शासन

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्र. ग्रापाअ-१५०९/प्र.क्र.१८०/पापु-०७
मंत्रालय, मुंबई -३२,
**दिनांक ३१ मार्च, २०१०**

वाचा:- १) शासन निर्णय, समक्रमांक, दिनांक १२ नोव्हेंबर,२००९
२) शासन निर्णय, समक्रमांक, दिनांक ३१ मार्च,२०१०

**प्रस्तावना:-**

ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत विशेष घटक योजनेखालील साधी विहिर कार्यक्रमासाठी आर्थिक वर्ष २००९-१० मध्ये रु. २५७.६७ लक्ष इतकी सुधारीत तरतुद मंजूर होती. संदर्भ क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये, यापैकी रु.२४३.७३ लक्ष निधी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना वितरीत करण्यात आलेला आहे.

दि.३१ मार्च,२०१० रोजी, जिल्हा परिषदांनी प्रत्यक्ष आहरीत केलेले अनुदान तसेच समर्पीत केलेले अनुदान विचारात घेऊन, आर्थिक वर्ष २००९-१० साठी लेखाशीर्ष २२१५ १३०६ खाली वितरीत केलेल्या अंतिम सुधारित अनुदानाचे आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय:-**

आर्थिक वर्ष २००९-१० मध्ये ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत विशेष घटक योजनेखालील साधी विहिर कार्यक्रमासाठी लेखाशीर्ष २२१५ १३१५ खाली संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना उपलब्ध करून दिलेल्या रु.२४३.७३ लक्ष सुधारीत तरतुदीतून सोबतच्या प्रपत्रातील स्तंभ ४ नुसार दि.३१ मार्च,२०१० पर्यंत जिल्हा परिषदांनी समर्पीत केलेली रु.२०.९८ लक्ष तरतूद विचारात घेऊन, स्तंभ ५ नुसार एकूण रु.२२२.७५ लक्ष (रु. दोन कोटी बावीस लक्ष पंचाहत्तर हजार फक्त) इतके अंतिम सुधारित अनुदान संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांना मंजूर करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाचा खर्च मागणी क्र. वाय-२, २२१५- पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१- पाणी पुरवठा १०२- ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम - अनुसूचित जातीकरिता विशेष घटक योजना- पिण्याचे पाणी पुरवठ्याचा ग्रामीण कार्यक्रम (०२) (१०) साधी विहिरी (२२१५ १३१५) ३१, सहायक अनुदाने या लेखाशिर्षाखाली सन २००९-१० या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या WWW.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१००४३०२०५६०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

**( श्री. श्री. घोलप )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) विभागीय आयुक्त, सर्व
२) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
३) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
४) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.
५) मुख्य अभियंता, भारत निर्माण कक्ष, बेलापूर, नवी मुंबई
६) विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व) (उपायुक्त विकास)
७) अधीक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष (सर्व)
८) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
९) महालेखापाल, महाराष्ट्र-१ ,मुंबई (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता)
१०) महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता)
११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई.
१३) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नाशिक, पुणे, अमरावती, औरंगाबाद व नागपूर
१४) वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई
१५) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) उप सचिव, विशेष घटक योजना-१, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
१७) संचालक, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
१८) विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी, सोलापूर
१९) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने क्र. पापु-०४, पापु-०५ व पापु-२०
२०) ग्रामविकास व जलसंधारण विभाग (वित्त-२)
२१) निवडनस्ती, पापु-०७

**प्रपत्र**

शासन निर्णय क्र. ग्रापाअ-१५०९/प्र.क्र.१८०/पापु-०७, दिनांक ३१ मार्च, २०१० चे सहपत्र,
लेखाशीर्ष २२१५ १३१५ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जाती उपयोजनेंतर्गत विशेष घटक योजनेखालील विंधण विहिर कार्यक्रमासाठी आर्थिक वर्ष २००९-१० मध्ये मंजूर अंतिम सुधारित अनुदान

**(रु.लक्षमध्ये)**

| अनु. क्र. | जिल्हा | आर्थिक वर्ष २००९-१० मध्ये उपलब्ध करून दिलेला एकूण निधी | जिल्हा परिषदांनी समर्पीत केलेले अनुदान | जिल्हा परिषदांना मंजूर करण्यात येत असलेले अंतिम सुधारित अनुदान |
|---|---|---|---|---|
| १ | २ | | | |
| १ | रत्नागिरी | १६.०० | ०.०० | १६.०० |
| २ | सिंधुदुर्ग | ५.४४ | ०.०० | ५.४४ |
| ३ | नाशिक | ०.६४ | ०.०० | ०.६४ |
| ४ | अहमदनगर | ३.९० | ०.०० | ३.९० |
| ५ | सातारा | ३०.४६ | १९.३३ | ११.१३ |
| ६ | सोलापूर | ६.४० | ०.०० | ६.४० |
| ७ | कोल्हापूर | ४६.६२ | ०.०० | ४६.६२ |
| ८ | जालना | ३.२० | ०.०० | ३.२० |
| ९ | परभणी | ६.४० | ०.०० | ६.४० |
| १० | बीड | ११२.०० | ०.०० | ११२.०० |
| ११ | अकोला | ३.८४ | १.२१ | २.६३ |
| १२ | यवतमाळ | ०.३२ | ०.०० | ०.३२ |
| १३ | भंडारा | ७.०९ | ०.०० | ७.०९ |
| १४ | गोंदिया | १.४२ | ०.४४ | ०.९८ |
| | एकूण | २४३.७३ | २०.९८ | २२२.७५ |

**(रुपये दोन कोटी बावीस लक्ष पंचाहत्तर हजार फक्त )**

**( श्री. श्री. घोलप )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

F:\CR 180 09 FMG 2215 1315 310310.doc